**“राज्यातील न्यायालयीन इमारतींचे परिरक्षण व दुरुस्ती” या प्रयोजनार्थ स्वतंत्र नवीन लेखाशिर्ष निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-२०२४/प्र.क्र.६४/अर्थ-२**
मंत्रालय, (मुख्य इमारत) चौथा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १६ मे, २०२५

**वाचा** :-महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-II, नागपुर यांच्या कार्यालयाचे पत्र क्रमांक क्र.टि.एम./जिआर.III /युओआर-३३/२०२५-२६ दिनांक ०९.०४.२०२५

**प्रस्तावना :-**

राज्यात उच्च न्यायालय खंडपीठे, जिल्हा न्यायालय, तसेच इतर विविध न्यायालयीन इमारती आहेत. सदर इमारतींच्या वार्षिक देखभाल दुरुस्तीकरीता मोठ्या प्रमाणात निधीची आवश्यकता असते. न्यायालये ही राज्यातील अत्यंत महत्वाच्या इमारती असून, सदर इमारतींमध्ये परिरक्षण व दुरुस्तीविषयक काही काम उद्भवल्यास सदर काम हे प्राधान्याने करावे लागते. इमारतींची नियमित देखभाल दुरुस्ती केल्यास इमारतींचे आयुष्य वाढते. सदर कामांसाठी तात्काळ पुरेसा निधी उपलब्ध करुन देण्याबाबत मा.न्यायालयाकडून शासनास वेळोवेळी निर्देशित करण्यात येते. या इमारतींमध्ये विविध न्यायालयीन प्रकरणांसंबंधी कागदपत्रे, पुरावे आणि इतर महत्वाचे दस्तऐवज असतात, त्यामुळे त्यांचे संरक्षण होणे आवश्यक असते.

सद्यस्थितीमध्ये शासकिय अनिवासी इमारतींच्या परिरक्षण दुरुस्तीसाठी उपलब्ध असलेल्या लेखाशिर्षामधूनच न्यायालयीन इमारतींची परिरक्षण दुरुस्ती करण्यात येते. तथापि शासकीय अनिवासी इमारतींच्या परिरक्षण व दुरुस्तीकरिता अर्थसंकल्पित तरतूदीच्या तुलनेत दायित्व मोठ्या प्रमाणावर आहे. अनिवासी इमारतींच्या परिरक्षण दुरुस्तीचे मोठ्या प्रमाणावरील दायित्व व न्यायालयीन इमारतींच्या नियमित परिरक्षण दुरुस्तीची निकड विचारात घेता, न्यायालयीन इमारतींच्या परिरक्षण व दुरुस्तीसाठी स्वतंत्र लेखाशिर्ष निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

१. राज्यातील “ न्यायालयीन इमारतींचे परिरक्षण व दुरुस्ती करणे” या प्रयोजनार्थ पुढीलप्रमाणे नवीन लेखाशिर्ष निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**राज्यातील न्यायालयीन इमारतींची परिरक्षण व दुरुस्ती :-**

| **मागणी क्रमांक एच-६** | | **Demand No H-6** | |
|---|---|---|---|
| २०५९ | सार्वजनिक बांधकामे | 2059 | Public Works |
| ०१ | कार्यालयीन इमारती | 01 | Office Buildings |
| ०५३ | परिरक्षण व दुरुस्ती | 053 | Maintenance and Repairs |

| | | | |
|---|---|---|---|
| (०३) | कार्यालयीन इमारतींचे परिरक्षण व दुरुस्ती | (03) | Maintenance and Repairs of Office Buildings |
| (०३)(३३) | न्यायालयीन इमारतींचे परिरक्षण व दुरुस्ती (अनिवार्य)<br>२०५९ ४७७२ | (03)(33) | Maintenance and Repairs of Court Buildings (Committed)<br>2059 4772 |
| | २७-लहान बांधकामे | | 27-Minor Works |

२. सदरचा शासन निर्णय हा महालेखापाल, महाराष्ट्र-II, नागपुर यांचे उक्त वाचा येथील पत्र तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३३/अर्थ-१२ दिनांक २५/०३/२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२५०५१६१४५८३०१७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANJIT SHIVAJIRAO AHIRE

Digitally signed by RANJIT SHIVAJIRAO AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=1abde6c83c28d6dbd9f52f359ea16d2e960f16f7ca457601da7303357626d5f5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7695265D501491899F1C290C5FAC1C7252F8D5F4D75CE48B86577435F1F4D615, cn=RANJIT SHIVAJIRAO AHIRE
Date: 2025.05.16 14:59:15 +05'30'

**(रणजित अहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर.
२. अपर मुख्य सचिव, (वित्त) मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, पाचवा मजला, मुंबई
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८. सचिव, (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, सर्व.
१०. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सर्व.
११. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सर्व.
१२. अधिदान व लेखाधिकारी,सर्व.
१३. निवासी लेखाधिकारी.सर्व.
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
१५.वित्त विभाग (व्यय-११/अर्थ-१२), मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती (कार्यासन अर्थ-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.